# महाराष्ट्र शासन

## समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग

शासन निर्णय क्रमांक सीबीसी-१४७७/५१४६५/का-५

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १३ फेब्रुवारी १९७८

**संदर्भ.**—(१) शासन निर्णय, शिक्षण व समाजकल्याण विभाग, क्रमांक सीबीसी-१४६७-म, दिनांक १३ ऑक्टोबर/१९६७.

(२) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक सीबीसी-१४७०/६३११७/का-५, दिनांक १२ ऑक्टोबर १९७६.

(३) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक सीबीसी-१४७७/३५२५६/का-५, दिनांक १६ ऑगस्ट १९७७.

(४) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक सीबीसी-१४७५/२७२/का-५, दिनांक ९ डिसेंबर १९७७.

**शासन निर्णय.**—शिक्षण व समाजकल्याण विभागाच्या क्रमांक सीबीसी-१४६७-म, दिनांक १३ ऑक्टोबर १९६७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या व वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या इतर मागासवर्गाच्या यादीत खाली नमूद केलेल्या जातींचा समावेश क्रमांक १९५ व १९६ म्हणून करण्यात यावा :—

क्रमांक १९५—तांबोळी (मुस्लीम धर्मीय).

क्रमांक १९६—अनुसूचित जातीतून ख्रिश्चन धर्म स्वीकारलेले.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सही) म. ब. सुळे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.